**बालाजी युवक क्रीडा मंडळ, जि.अकोला संचलित श्री समर्थ स्कूल, कासारखेडा, ग्रामपंचायत शेळद, ता.बाळापूर, जि.अकोला शाळेचे, श्री गजानन महाराज शिक्षण प्रसारक मंडळ, जि.वाशिम या संस्थेस हस्तांतर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्राशाह ३११८/प्र.क्र.३६०/एसएम-१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : १९ डिसेंबर, २०१८

**वाचा :-** शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांकः माशाह २०११/(२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२.

**संदर्भ:-**विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती यांचे क्र.प्राथ/क/२४५२७/२०१४, दिनांक १८ सप्टेंबर, २०१४ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

बालाजी युवक क्रीडा मंडळ, जि.अकोला संचलित श्री समर्थ स्कूल (पूर्वीचे नाव- बालाजी मराठी प्राथमिक शाळा) कासारखेडा, ग्रामपंचायत शेळद, ता.बाळापूर, जि.अकोला या मराठी माध्यमाच्या प्राथमिक व उच्च प्राथमिक विनाअनुदानित शाळेचे, श्री गजानन महाराज शिक्षण प्रसारक मंडळ, जि.वाशिम या संस्थेस हस्तांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सदर शाळा विषयाधीन संस्थेस हस्तांतर करण्यास खालील नमूद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

(१) सदर शाळेच्या हस्तांतरणास संमतीबाबत बालाजी युवक क्रीडा मंडळ, जि.अकोला या संस्थेच्या अध्यक्ष व सर्व सदस्यांची स्वाक्षरी असलेले तसेच या संस्थेच्या नोंदणीपासून आतापर्यंत कार्यकारीणीत बदल झालेला नाही याबाबतचे रू.१००/- च्या स्टँम्प पेपरवर नोटराईज्ड शपथपत्र सादर करणे आवश्यक राहील.

(२) सदर शाळेच्या शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची हस्तांतरणास संमती असल्याबाबत मूळ संमतीपत्राआधारे विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती यांनी पडताळणी करणे आवश्यक राहील.

(३) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेची कोणत्याही कारणास्तव किमान पटसंख्येची अट शिथिल केली जाणार नाही.

(४) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ व याबाबत शाळेसाठी शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या आदेशांनुसार शाळेसाठी पक्की इमारत, सर्व भौतिक सुविधा व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन देण्यात येतील, याबाबत नवीन संस्थेचे अध्यक्ष/सचिव यांचे रु.१००/-च्या स्टँप पेपरवर नोटरी केलेले शपथपत्र सादर करणे आवश्यक राहील.

(५) हस्तांतरणास संमती दिलेल्या अर्हताप्राप्त शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सामावून घेण्यात येईल व त्यांच्या सेवाशर्तीमध्ये बदल होणार नाही, याबाबत नवीन संस्थेचे अध्यक्ष/सचिव यांचे रु.१००/- च्या स्टँप पेपरवर नोटरी केलेले शपथपत्र सादर करणे आवश्यक राहील.

(६) सदर शाळेची संच मान्यता प्रत, सरलची माहिती सादर करणे आवश्यक राहील.

(७) सदर शाळा अनुदानाच्या ज्या तत्वावर आहे, त्याच तत्वावर हस्तांतरणानंतरही कार्यरत राहील.

(८) शासन निर्णय, दिनांक २८/०८/२०१५ मधील संचमान्यतेच्या सुधारीत निकषांनुसार तसेच, शाळांबाबत शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या आदेशानुसार अनुज्ञेय होणाऱ्या पदांइतके शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी कार्यरत राहतील व त्यापेक्षा जास्त शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी कार्यरत राहणार नाहीत, हे संस्थेवर बंधनकारक राहील तसेच, अनुज्ञेय पदांपैकी रिक्त पदे अतिरिक्त कर्मचाऱ्यांमधून भरण्याबाबत शासनाच्या धोरणानुसार कार्यवाही करणे आवश्यक राहील.

(९) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या/मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाही याची खबरदारी घेण्यात यावी.

(१०) शासनाकडून शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेत्तर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.

(११) सदर व्यवस्थापन बदल, शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक: माशाह २०११/(२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२ मध्ये विहित केलेल्या नियमानुसार व कार्यपद्धतीनुसार अंमलात येईल.

(१२) सदरहू व्यवस्थापन बदलासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे नव्याने कोणत्याही प्रकारच्या तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा व्यवस्थापन बदला संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास किंवा व्यवस्थापन बदलापूर्वीच्या संस्थेतील कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवाशर्तीचा नवीन संस्थेद्वारा भंग झाल्यास, हस्तांतरण रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. वरील अट क्र.(१), (२), (४), (५) व (६) ची पूर्तता झाल्यावर विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती यांनी सर्व बाबी तपासून आणि आवश्यक अन्य अटींचा समावेश करुन, शाळेच्या व्यवस्थापन बदलाबाबत आवश्यक पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१९१५०१०३२४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2018.12.19 15:08:15 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत –**

१) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती
३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, अकोला
४) अध्यक्ष/सचिव, बालाजी युवक क्रीडा मंडळ, मु.पो.वाडेगांव, ता.बाळापूर, जि.अकोला
५) अध्यक्ष/सचिव, श्री गजानन महाराज शिक्षण प्रसारक मंडळ, जि.वाशिम
६) निवडनस्ती ( एसएम-१).